शासकीय/निमशासकीय/मंडळे/महामंडळे/
नगरपालिका/महानगरपालिका इत्यादी
कार्यालयांमध्ये मागासवर्ग कक्ष स्थापन
करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन परिपत्रक क्र.बीसीसी-२०१०/प्र.क्र.४०९/१६-ब
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२
दिनांक : १६ ऑगस्ट, २०१०.

वाचा : शासन परिपत्रक क्र.बीसीसी २००४/१६६६/प्र.क्र.६१/०४/१६-ब,
दिनांक १० ऑगस्ट, २००४.

<u>प्रस्तावना</u> : शासन परिपत्रक क्र.बीसीसी २००४/१६६६/प्र.क्र.६१/०४/१६-ब, दिनांक १० ऑगस्ट, २००४ नुसार शासकीय/निमशासकीय तसेच मंडळे/महामंडळे/नगरपालिका/महानगर पालिका/ शासकीय उपक्रम, अनुदानित संस्था, विद्यापीठे, सहकारी संस्था, शैक्षणिक अनुदानित संस्था इत्यादींमध्ये ज्या कार्यालयांमध्ये १००० पेक्षा अधिक अधिकारी व कर्मचारी वृंद आहे अशा कार्यालयांमध्ये मागासवर्ग कक्ष स्थापन करण्यात यावा असे आदेश शासनाने दिले आहेत.

या संदर्भात अध्यक्ष, अनुसूचित जमाती कल्याण समिती, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई यांच्याकडे दिनांक ४ जून, २०१० रोजी झालेल्या सचिवांच्या साक्षीच्या वेळी त्यांनी सदर आदेशातील १००० इतक्या अधिकारी व कर्मचारी वृंदाच्या मर्यादेत सुधारणा करुन ती संख्या कमी करणे आवश्यक असल्याचे मत व्यक्त केले.

<u>शासन परिपत्रक</u> : उपरोक्त बाबत विचार करुन शासन आता असे आदेश देत आहे की, ज्या कार्यालयांमध्ये ५०० पेक्षा अधिक अधिकारी व कर्मचारी वृंद आहे, अशा कार्यालयांमध्ये मागासवर्ग कक्ष स्थापन करावा.

२. शासन परिपत्रक, दिनांक १०.८.२००४ मधील क्रमांक २ पुढे दिलेल्या आदेशामध्ये या अनुषंगाने १००० च्या ऐवजी ५०० इतकी अधिकारी व कर्मचारी वृंदाची मर्यादा राहील. शासन परिपत्रक, दिनांक १०.८.२००४ मधील अन्य आदेश जसे आहेत तसे लागू रहातील.

३. मंत्रालयीन विभागांनी त्यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व शासकीय/ निमशासकीय, मंडळे/महामंडळे, शासकीय उपक्रम इत्यादी कार्यालयांना या परिपत्रकानुसार

योग्य त्या सूचना निर्गमित कराव्यात व यानुसार कार्यवाही करण्यात आली आहे याची खातरजमा करावी.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक २०१००८१६१८४३४२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( दि. रा. डिंगळे )
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

प्रति,
सर्व विधानसभा व विधान परिषद सदस्य,
मा.राज्यपाल यांचे सचिव,
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
मा. उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव/अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालयीन विभाग,
सर्व मंत्रालयीन विभाग (आस्थापना शाखा),
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय,मंत्रालय,मुंबई
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
* प्रबंधक, लोकायुक्त आणि उप लोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक,
संचालक, समाज कल्याण, पुणे,
सदस्य सचिव, अनुसूचित जाती व जमाती आयोग, १ला मजला,प्रशासकीय इमारत (डेअरी विभाग), अब्दुल गफारखान मार्ग, वरळी सी फेस, मुंबई ४०० ०१८,
सहायक आयुक्त (मागासवर्ग कक्ष), सर्व विभागीय आयुक्तांची कार्यालये,
सर्व मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई,
निवड नस्ती,
* पत्राने.

-------